अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१४-२०१५
"२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणीपुरवठा ००१,
संचालन व प्रशासन (०१) (०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या
अंमलबजावणीसाठी विभागीय /उपविभागीय आस्था
(२२१५ १८४३), दत्तमत "

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक: ३१ मार्च, २०१५**

वाचा

**१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दिनांक २ जानेवारी, २०१५**
**२) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक ५ मे, २०१४**
**३) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक २० सप्टेंबर, २०१४**
**४) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक ३० ऑक्टोंबर, २०१४**
**५) शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक २१ जानेवारी, २०१५**

प्रस्तावना

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील अधिकारी /कर्मचारी वर्ग-१ व वर्ग-२ यांचे वेतन व इतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणीपुरवठा-००१, संचालन व प्रशासन (०१) (०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय /उपविभागीय आस्थापना (२२१५ १८४३) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी एकूण रुपये २४,५८,७४,०००/- (अक्षरी रुपये चौवीसकोटी,अठावन्न लक्ष, चौ-याहत्तर हजार फक्त) इतकी तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी ०१ वेतनासाठी रुपये २३,७६,९८,०००/- (अक्षरी रुपये तेवीस कोटी, शहात्तर लक्ष, अठयाणव हजार फक्त) व ११ देशांतर्गत प्रवास खर्चासाठी रुपये ८१,७६,०००/- (अक्षरी रुपये ऐक्याऐंशी लक्ष, शहात्तर हजार फक्त )इतकी तरतूद करण्यात आली आहे.

२. आता, उपरोक्त लेखाशीर्षाखाली शासनाकडे समर्पित करण्यात आलेल्या अनुदानापैकी रु. २३५८१४/- इतके अनुदान मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद अहमदनगर यांना फेरवाटप करुन उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र राज्यातील जिल्हा परिषदांतील ग्रामीण पाणी पुरवठा विभागातील व उपविभागातील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतनेत्तरवरील खर्च भागाविण्यासाठी लेखाशिर्ष २२१५ १८४३, ०१ वेतन, या उपलेखाशिर्षाखाली शासनाकडे समर्पित अनुदानापैकी रु. २३५८१४/- इतकी रक्कम संबधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद अहमदनगर यांना मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहिल. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची दक्षता सर्व संबधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी घ्यावी. सदर खर्च संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मासिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर खर्च मागणी क्र.वाय-२, "२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणी पुरवठा-००१, संचालन व प्रशासन (०१)(०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/उपविभागीय आस्थापना(२२१५ १८४३) (दत्तमत)" ०१ वेतन, या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/ प्र. क्र. ८५/ अर्थसंकल्प-३, दिनांक ०२ जानेवारी, २०१५ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१५०३३११८०३३६८५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MHASKE GAURI RAHUL
DN: CN = MHASKE GAURI RAHUL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918027
Date: 2015.03.31 19:35:37 +05'30'

**गौरी रा. म्हस्के**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विभागीय आयुक्त सर्व
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई

४. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे.

५. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

६. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

७. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता,

८. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)

१०. महालेखापाल, महाराष्ट्र - १ मुंबई (लेखा परिक्षा( (५ प्रतीस)

११. महालेखापाल, महाराष्ट्र - १ मुंबई (लेखा अनुज्ञेयता((५ प्रतीसह)

१२. महालेखापाल, महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा परिक्षा( (५ प्रतीसह)

१३. महालेखापाल, महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा अनुज्ञेयता( (५ प्रतीसह)

१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१५. उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद (सर्व)

१६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई

१७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर

१८. वित्त विभाग (व्यय-३ व अर्थ-१९)

१९. कार्यासन क्रमांक पापु-०४ व २०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

२०. ग्राम विकास व जलसंधारण विभागा (५प्रती)